**पर्यटन धोरणांतर्गत पात्र पर्यटन प्रकल्पांना अनुज्ञेय वित्तीय प्रोत्साहनाच्या सवलतीपोटी वस्तु व सेवा करातील राज्याच्या हिश्यांच्या रकमे इतकी रक्कम सन २०२२-२३ मध्ये परतावा म्हणून वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२३/०१/प्र.क्र.१७/पर्यटन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२३

**संदर्भ :**
१. विभागाचा शासन निर्णय क्रमांक टिडीसी २०१७/०९/प्र.क्र.१०४/पर्यटन, दि.०४/०३/२०२०.
२. विभागाचा शासन निर्णय क्रमांक टिडीसी २०२३/०१/प्र.क्र.१७/पर्यटन, दि.१७/०३/२०२३.
३. पर्यटन संचालनालयाचे पत्र क्र.प.सं./पर्यटन धोरण/SGST Refund/२०२३/८२९, दि.०२/०३/२०२३

**प्रस्तावना :**

वस्तू व सेवा कर अधिनियमानुसार करांमध्ये सूट देण्याचे प्रावधान नसल्याने पर्यटन धोरण - १९९९, पर्यटन धोरण - २००६ व पर्यटन धोरण-२०१६ अंतर्गत पात्र पर्यटन प्रकल्पांना अनुज्ञेय करण्यात आलेल्या विक्रीकर, ऐषाराम कर, करमणूक कर, मुल्यवर्धित कर इत्यादी करांमधून सूट देण्याच्या सवलतीपोटी संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय, दि.०४/०३/२०२० अन्वये स्वतंत्ररित्या अनुज्ञेय करण्याचा परतावा हा सवलत रकमेच्या कमाल मर्यादेपर्यंत किंवा प्रोत्साहन सवलतींच्या मूळ अनुज्ञेय कालावधीपर्यंत यापैकी ज्याची पूर्तता आधी होईल तोपर्यंत अनुज्ञेय करण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

पर्यटन संचालनालयाने संदर्भ क्रमांक ३ येथील दि.०२/०३/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खालील तक्त्यामध्ये नमूद एकूण ४ पात्र पर्यटन घटकांनी भरणा केलेल्या वस्तू व सेवा कर परताव्यापोटी सन २०२२-२३ या वर्षासाठी स्तंभ क्रमांक १० येथे नमूद केलेली एकूण रु. **रु.४,६५,७५,६००/-** (रुपये चार कोटी पासष्ट लक्ष पंच्च्याहत्तर हजार सहाशे रुपये) एवढी रक्कम वित्तीय प्रोत्साहनांच्या सवलीतीपोटी वस्तू व सेवा करातील राज्याच्या हिश्याच्या रकमेइतकी रक्कम परतावा म्हणून वितरीत करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

| अ. क्र. | पर्यटन प्रकल्पाचे नाव व जीएसटी नोंदणी क्र. | पर्यटन धोरण | मागील शिल्लक देय परतावा | वर्ष | | | एकुण मागणी | शासन निर्णय दि.०४.०३.२०२० नुसार ८५% देय परतावा | एकुण मागणी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | नवीन मागणी | | | | | |
| | | | | २०२०-२१ | २०२१-२२ | २०२२-२३ | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १. | मे.हीथ व्हीव हॉलिडे रिसॉर्ट लि. (एव्हरशाईन रिसॉर्ट) 27AAACH2061H1ZW | २००६ | ---- | ---- | ७२,२९,२६६ | ८३,५८,४३५ | १,५५,८७,७०१ | १,३२,४९,५४५ | १,२४,७०,६१७ |
| २. | मे. डेला ॲडव्हेंचर ॲन्ड रिसोर्ट प्रा.लि. (पार्क) 27AADCD2549K1ZH | २००६ | --- | ---- | ६१,५७,००० | ---- | ६१,५७,००० | ५२,३३,४५० | ५२,३३,४५० |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | मे. डेला ॲडव्हेंचर ॲन्ड रिसोर्ट प्रा.लि. (रिसॉर्ट) 27AADCD2549K1ZH | २००६ | --- | -- | २,८५, १०,००० | ---- | २,८५, १०,००० | २,४२,३३,५०० | २,४२,३३,५०० |
| ४. | मे. हिलक्रेस्ट रिसॉर्ट स्पा प्रा. लि. 27AACCH8196FIZA | २०१६ | --- | ----- | --- | ५४,५६,५०९ | ५४,५६,५०९ | ४६,३८,०३२.६५ | ४६,३८,०३३ |
| | **एकूण** | | -- | --- | **४,१८,९६,२६६** | **१,३८,१४,९४४** | **५,५७,११,२१०** | **४,७३,५४,५२८.५** | **४,६५,७५,६००** |

०२. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे. संदर्भ क्रमांक ०१ येथील दिनांक ०४/०३/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतूदींचे पालन करण्यात यावे. तसेच संबंधित पात्र पर्यटन घटकांना रकमा अदा करण्यापूर्वी संदर्भ क्र.०१ येथील दिनांक ०४/०३/२०२० च्या शासन निर्णयामधील परिच्छेद ३ (३.१ ते ३.८) मधील तरतुदींचे पालन करण्यात आले आहे, याची खातरजमा करण्यात यावी.

०३. पर्यटन घटकांनी केलेली मागणी पर्यटन धोरणानुसार अनुज्ञेय मर्यादित असल्याची खात्री करुन निधी वितरीत करण्यात यावा. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील व जादा खर्चाप्रित्यर्थ जादा रक्कम उपलब्ध करुन दिली जाणार नाही.

०४. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२२-२३ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मागणी क्रमांक झेडडी - ४, मुख्य लेखाशीर्ष ३४५२, पर्यटन " पर्यटन धोरणांतर्गत पात्र पर्यटन प्रकल्पांना वित्तीय प्रोत्साहनाच्या सवलीतीपोटी वस्तू व सेवा करातील राज्याच्या हिश्श्याच्या रकमेचा परतावा (३४५२ २९९२) (अनिवार्य) ५०, इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना 'नियंत्रण अधिकारी॰ घोषित करण्यात येत आहे. मंजूर करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना विहित पध्दतीव्दारे वितरीत करण्यात यावी. केलेल्या कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२३०३३१११३९१७७१२३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल व यांच्या आदेशानुसार व नांवाने.

UJJWALA SANTOSH DANDEKAR

Digitally signed by UJJWALA SANTOSH DANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=c63ad337cb443baf4ff2dd616156bccf1f2629f47cc9704e8e8523f35b0e6505, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB0449B3A46260C9CACDAD789E301DD18ABAA6D766D244021239745A6F561B29, cn=UJJWALA SANTOSH DANDEKAR
Date: 2023.12.28 14:57:54 +05'30'

**( उज्ज्वला दांडेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (का. व्यय-१५/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.

८. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या ZD००१२ या नियंत्रण सांकेतांकावर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)

९. सर्व संबंधित पर्यटन प्रकल्पधारक.

१०. निवड नस्ती, पर्यटन.

***